**श्री. विजयकुमार मारोतीराव ईखार, नगर रचनाकार (गट-अ/राजपत्रित) अकोला महानगरपालिका, अकोला यांची स्वेच्छासेवानिवृत्ती मंजूर करुन त्यांना शासन सेवेतून कार्यमुक्त करण्याबाबत...**

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग,**
**शासन आदेश क्र.स्वेच्छानि-४९१८/९३६/प्र.क्र.७६/नवि-२७,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
चौथा मजला, मंत्रालय, मुंबई- ४०००३२.
**दिनांक :- ०७ ऑगस्ट, २०१८.**

वाचा :- १. श्री. वि.मा.ईखार, नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) यांचा दि.०८.०५.२०१८ चा अर्ज.
२. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचे पत्र क्र.आस्था/विमाई-नर/स्वेच्छासेवानिवृत्ती/प्रशा-१ब/३८६१, दि.२५.०६.२०१८.

**प्रस्तावना** :-

श्री. विजयकुमार मारोतीराव ईखार, नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) यांनी वैयक्तिक अडचणीमुळे स्वेच्छा सेवानिवृत्ती घेण्याची इच्छा व्यक्त करुन दि.०८.०५.२०१८ रोजीच्या अर्जान्वये ०३ महिने पूर्वसूचना (Notice) दिली आहे.

**०२.** संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी संदर्भाधीन दि.२५.०६.२०१८ रोजीच्या पत्रान्वये श्री. विजयकुमार मारोतीराव ईखार, नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) यांची स्वेच्छा सेवानिवृत्तीची पूर्वसूचना स्वीकारण्यात येऊन त्यांना दि.०८.०८.२०१८ (म.पू.) पासून शासन सेवेतून कार्यमुक्त करण्याबाबतचा प्रस्ताव शासन मान्यतेस्तव सादर केला आहे. याबाबत पुढीलप्रमाणे शासन आदेश देण्यात येत आहेत :-

**शासन आदेश :-**

महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तिवेतन) नियम, १९८२ मधील नियम ६५ (१) (ए) मधील तरतूदीनुसार श्री विजयकुमार मारोतीराव ईखार, नगर रचनाकार , अकोला महानगरपालिका, अकोला यांची दि.०८.०५.२०१८ रोजीची स्वेच्छा सेवानिवृत्तीची पूर्वसूचना स्वीकारुन त्यांना दि.०८.०८.२०१८ (म.पू.) पासून शासन सेवेतून कार्यमुक्त करण्यास शासन मान्यता देण्यात येत आहे.

**०२.** श्री. विजयकुमार मारोतीराव ईखार, नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) यांच्याविरुद्ध सद्यस्थितीत कोणतीही विभागीय चौकशी / न्यायालयीन / लाचलुचपत / शिस्तभंगविषयक प्रकरण सुरु अथवा प्रलंबित / प्रस्तावित नाही तसेच त्यांच्याकडून कोणत्याही प्रकारचे शासकीय येणे शिल्लक नाही, या अटींच्या अधीन राहून त्यांना स्वेच्छा सेवानिवृत्त होण्यास शासन मंजूरी देण्यात येत आहे.

**०३.** संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी या प्रकरणी आवश्यक ते कार्यकारी आदेश निर्गमित करण्याची कार्यवाही करावी.

**०४.** सदर शासन आदेश महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून, त्याचा संगणक संकेताक क्रमांक **२०१८०८०७११४८५८२०२५** असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Vishnu Shripati Patil

Digitally signed by Vishnu Shripati Patil
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Urban Development Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=21ebe4508a75a767041512feeaa6b8f2d5bc8caf857fe02cd29ce4bbb772da09, serialNumber=f8a0fc598f692587efafe9bd62df9e449fdf81c803c27adf1782c97c76ebcba5, cn=Vishnu Shripati Patil
Date: 2018.08.10 15:32:53 +05'30'

**( विष्णू पाटील )**
**अवर सचिव, महाराष्ट्र शासन.**

**प्रत :-**

१. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई.
२. महालेखापाल,/ महाराष्ट्र-२ (लेखा व अनुज्ञेयता), नागपूर.
३. महालेखापाल, महाराष्ट्र-१ (लेखा परीक्षा), मुंबई.
४. महालेखापाल,/ महाराष्ट्र-२ (लेखा परीक्षा), नागपूर.
५. मा. मुख्य मंत्र्याचे प्रधान सचिव, मंत्रालय, मुंबई.
६. मा. राज्यमंत्री, नगर विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
७. मा. प्रधान सचिव (नवि-१) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
८. मा. प्रधान सचिव (नवि-२) यांचे स्वीय सहायक, नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
९. आयुक्त, अकोला महानगरपालिका, अकोला.
१०. संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-४११ ००१. **(३-प्रती)**
११. सह संचालक, नगर रचना, अमरावती विभाग, अमरावती.
१२. सहायक संचालक, नगर रचना, अकोला महानगरपालिका, अकोला.
१३. जिल्हा कोषागार अधिकारी, अकोला
१४. श्री. विजयकुमार मारोतीराव ईखार, नगर रचनाकार (गट-अ / राजपत्रित) अकोला महानगरपालिका, अकोला यांना (संचालक, नगर रचना व मूल्यनिर्धारण संचालनालय, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्यामार्फत)
१५. निवडनस्ती / नवि-२७.